“खाजगी वाहतुकदारांकडून घेण्यात येणाऱ्या वाहनांच्या दरकरारास मुदतवाढ देण्याबाबत...”

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शापसे-२०१४/प्र.क्र. २४२/का. ३१,**
सचिवालय जिमखाना, १ ला मजला, मंत्रालयासमोर,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ ऑक्टोबर, २०१४

**वाचा :** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.:शापसे-१०१२/प्र.क्र.२/का.३१,
दिनांक-३/११/२०१२.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधिन शासन निर्णयान्वये शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई यांचेकडून अति अति महत्वाचे मान्यवर व मा. राज्य अतिथींच्या परिवहन व्यवस्थेसाठी, पुरेशी शासकीय डी. व्ही. वाहने उपलब्ध नसताना, खाजगी पुरवठादारांकडून भाडेतत्वावर वाहने पुरविण्यासाठी दि. ०२/११/२०१२ ते ०१/११/२०१४ या कालावधीसाठी मंजूरी देण्यात आली होती. सदर मंजूरी दि. २ नोव्हेंबर, २०१४ रोजी संपुष्टात येत असल्यामुळे खाजगी वाहन पुरवठादारांबरोबर नवीन दरकरार करण्याबाबतची ई-निविदा कार्यवाही सुरु आहे. सदर कार्यवाही पूर्ण होण्यासाठी आणखी काही कालावधी लागण्याची शक्यता आहे. यास्तव पुरेशा डी. व्ही. वाहनांअभावी मान्यवरांच्या परिवहन व्यवस्थेमध्ये अडचणी निर्माण होऊ नयेत म्हणून दिनांक ३ नोव्हेंबर, २०१२ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी दिलेल्या दरकरारास मुदत वाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई या कार्यालयाने अति अति महत्वाचे मान्यवर व मा. राज्य अतिथींच्या परिवहन व्यवस्थेसाठी, पुरेशी शासकीय डी. व्ही. वाहने उपलब्ध नसताना, खाजगी पुरवठादारांकडून भाडेतत्वावर वाहने पुरविण्यासाठी, खाजगी पुरवठादारांची नव्याने नियुक्ती करण्यासाठी व नवीन दरकरार करण्यासाठी सुरु केलेली ई-निविदा प्रक्रिया/कार्यवाही पार पाडून दरकरारास शासनाची मंजूरी मिळण्यास काही कालावधी लागेल हे विचारात घेऊन आता शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.:शापसे-१०१२/प्र.क्र.२/३१, दिनांक ३ नोव्हेंबर, २०१२ अन्वये मंजूर करण्यात आलेल्या दरकरारास **दि. ३०.११.२०१४ पर्यंत किंवा नविन दरकरार निश्चित होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत** मुदतवाढ देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१४१०२९१५०५१३७९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

MORE ARVIND B

Digitally signed by MORE ARVIND B
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=MORE ARVIND B
Date: 2014.10.29 15:18:37 +05'30'

**(अ.भि.मोरे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१.संचालक, शासकीय परिवहन सेवा, सर पसेचखानवाला मार्ग, वरळी सी-फेस, वरळी, मुंबई - ४०० ०३०,
२. महालेखापाल (लेखापरीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
३. उप सचिव व उप राजशिष्टाचार अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, शिबिर कार्यालय, पहिला माळा, सचिवालय जिमखाना, मुंबई - ४०० ०३२,
४. उप सचिव/(राजशिष्टाचार)/का. ३१, सामान्य प्रशासन विभाग, शिबिर कार्यालय, पहिला माळा, सचिवालय जिमखाना, मुंबई - ४०० ०३२,
५. उप सचिव, व्यय-४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
६. उप सचिव, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
७. उप सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
८. परिवहन आयुक्त, परिवहन आयुक्त कार्यालय, बांद्रा (पूर्व), मुंबई,
९. अवर सचिव (राजशिष्टाचार)/का.३०, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
१०.अवर सचिव(शा.प.से.)/का.३१, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
११. नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, सर पसेचखानवाला मार्ग, वरळी सी-फेस, वरळी, मुंबई - ४०० ०३०,
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१३. प्रधान सचिव व मुख्य राजशिष्टाचार अधिकारी, यांचे स्वीय सहायक.
१४. निवडनस्ती/का.३१